**कुष्ठरोग निवारणासाठी सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात पुनर्वसन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिका-२०२०/प्र क्र.५०६/आरोग्य -५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: १९ जुलै,२०२४

**वाचा -:**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०११/प्र.क्र.३२१/आरोग्य-५, दि.२१ मार्च, २०१२

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०२०/प्र.क्र.५०६/आरोग्य-५, दि.०५ डिसेंबर, २०२३

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांकः कुनिका २०२०/प्र.क्र.५०६/ आरोग्य-५, दि.२८ डिसेंबर,२०२३

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४

५) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे-६ यांचे पत्र क्र.ससंआसे/कुष्ठवक्षय /अनुदानशाखा/पुर्नवसन तत्व/सन २०२३-२४/प्रलंबित अनुदान/न.क्र.८०/६१५५-५७/२४, दि.२२ मे, २०२४

**प्रस्तावना - :**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार पुनर्वसन तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी प्रतिरुग्ण जास्तीत जास्त रु.२,०००/- प्रमाणे अथवा परिरक्षणार्थ खर्चाच्या ८०% यापैकी कमी असेल ती रक्कम या प्रमाणात दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरिता संदर्भ क्र.५ येथील सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे-६ यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०२४-२५ या वित्तीय वर्षातील तरतूदीमधील रु.१,३८,२३,४२५/- ( रु. एक कोटी अडोतीस लाख तेवीस हजार चारशे पंचवीस फक्त ) इतके सहायक अनुदान पुनर्वसन तत्त्वावरील ११ स्वयंसेवी संस्थांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

कुष्ठरूग्णांसाठी पुनर्वसन तत्वावर काम करणाऱ्या ११ स्वंयसेवी संस्थाना सहायक अनुदाने देण्यासाठी सन २०२४-२५ या वर्षाकरिता "लेखाशिर्ष २२१० ०७४५, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या उद्दिष्टाखाली रू.४.५० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. उपरोक्त उद्दिष्टांतर्गतच्या रू.१.५० कोटी मंजूर लेखानुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे कुष्ठरूग्णांसाठी पुनर्वसन तत्वावर काम करणाऱ्या ११ स्वंयसेवी संस्थाना रू.१,३८,२३,४२५/- ( रु. एक कोटी अडोतीस लाख तेवीस हजार चारशे पंचवीस फक्त ) इतक्या सहायक अनुदानाच्या वितरणास संदर्भ क्र.१ येथील दि.२१ मार्च, २०१२ रोजीच्या शासन निर्णयातील अटींच्या पुर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | कुष्ठरोग निवारण समिती शांतीवन नेरे, जि.रायगड | जानेवारी २०२३ ते सप्टेंबर २०२३ | ३६० | रु.७,०१,८७४/- |
| | | ऑक्टोबर २०२३ ते डिसेंबर २०२३ | १२० | रु.२,३३,४५०/- |
| २ | सॅनिटोरिअम फॉर लेप्रसी पेशंट, मु.पो. वीर मांडकी, ता.पुरंदर, जि.पुणे | जानेवारी २०२३ ते मार्च २०२३ | ५७ | रु.१,१३,९६९/- |
| | | एप्रिल २०२३ ते सप्टेंबर २०२३ | १०० | रु.१,९७,१४८/- |
| ३ | आनंदग्राम सोसायटी डुडुळगांव, आळंदी देवाची, जि.पुणे | जानेवारी २०२३ ते मार्च २०२३ | १२ | रु.२४,०००/- |
| ४ | कुष्ठरोग पुनर्वसन केंद्र गोरापूर वडाळा मिशन, ता.नेवासा, जि. अहमदनगर | जानेवारी २०२३ ते मार्च २०२३ | ३३ | रु. ६६,०००/- |
| | | एप्रिल २०२३ ते जून २०२३ | ३३ | रु. ६६,०००/- |
| | | जुलै २०२३ ते सप्टेंबर २०२३ | ३३ | रु. ६६,०००/- |
| ५ | मराठवाडा लोकसेवा मंडळ, नेरली, जि.नांदेड | जानेवारी २०२२ ते मार्च २०२३ | २३७ | रु.४,३८,४१५/- |

| अ.क्र. | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान |
|---|---|---|---|---|
| ६ | नवनिर्माण समाजसेवक संघ मोराणे, जि.धुळे | जानेवारी २०२३ ते मार्च २०२३ | १११ | रु.२,२२,०००/- |
| | | एप्रिल २०२३ ते सप्टेंबर २०२३ | २३९ | रु.४,७८,०००/- |
| ७ | विदर्भ महारोगी सेवा मंडळ, तपोवन, जि.अमरावती | जानेवारी २०२३ ते मार्च २०२३ | ३२३ | रु.६,३६,१३२/- |
| | | एप्रिल २०२३ ते सप्टेंबर २०२३ | ६५४ | रु.१२,९९,३४५/- |
| | | ऑक्टोबर २०२३ ते डिसेंबर २०२३ | ३३२ | रु. ६,५७,४४४/- |
| ८ | महारोगी आश्रम, काशीखेड ता.धामणगांव रेल्वे जि. अमरावती | जानेवारी २०२३ ते मार्च २०२३ | ३७ | रु.६८,८०३/- |
| | | एप्रिल २०२३ ते सप्टेंबर २०२३ | ७७ | रु.१,४९,२१०/- |
| | | ऑक्टोबर २०२३ ते डिसेंबर २०२३ | ३९ | रु.७५,३८६/- |
| ९ | महारोगी सेवा समिती आनंदवन, वरोरा, जि.चंद्रपूर | एप्रिल २०२३ ते जून २०२३ | १२२० | रु.२४,४०,०००/- |
| | | जुलै २०२३ ते सप्टेंबर २०२३ | ११८८ | रु.२३,७६,०००/- |
| | | ऑक्टोबर २०२३ ते डिसेंबर २०२३ | ११६४ | रु.२३,२८,०००/- |
| १० | महारोगी सेवा समिती दत्तपूर वर्धा | जानेवारी २०२३ ते जून २०२३ | २३८ | रु.४,६५,७२१/- |
| | | जुलै २०२३ ते सप्टेंबर २०२३ | १२२ | रु.२,४०,५२८/- |
| ११ | महात्मा गांधी शिक्षण संस्था चावर्दा जि.बुलढाणा | जानेवारी २०२३ ते जून २०२३ | २४० | रु.४,८०,०००/- |
| एकूण | | | **६९६९** | **रु.१,३८,२३,४२५/-** |

२. सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात कुष्ठरूग्णांसाठी पुनर्वसन तत्वावर काम करणाऱ्या ११ स्वंयसेवी संस्थाना सहायक अनुदान वितरणाचा प्रस्ताव सादर करताना संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या दि.०१ एप्रिल, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकासोबतच्या मुद्दा क्र. ९ मधील तपासणी सूचीनुसार क्र.१ ते १० मधील सर्व अटींची पुर्तता केली असल्याचे प्रमाणपत्र सहसंचालक्र, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) यांनी सादर केले आहे. तसेच, संबंधित संस्थांना यापुर्वी वितरीत केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे देखील प्रस्तावासोबत सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) यांनी सादर केली आहेत.

३. सहसंचालक (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले असून, त्यांनी वरील अटी पुर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित सहायक अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी. तसेच, सदर अनुदानाशी संबंधित देयके संबंधित जिल्हयाच्या अधिदान व लेखा अधिकारी अथवा कोषागार अधिकारी यांच्याकडे सादर करण्यासाठी सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे. तसेच, या संदर्भातील सर्व विहीत कार्यपध्दती अवलंबून सदरचा खर्च होईल याबाबत आवश्यक ती खातरजमा करण्यात यावी.

४. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, प्रधानशिर्ष २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य उपशिर्ष (०१) (१८) कुष्ठरोग मुक्त झालेल्या रोग्यांना पुनर्वसनासाठी अनुदाने, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१००७४५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू वित्तीय वर्ष २०२४-२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२१५/का-१४७२, दि.२८.०६.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८९/२०२४/व्यय-१३, दि.०३.०७.२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७१९१०३७५००५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH GURULING HANSHETTI

Digitally signed by MAHESH GURULING HANSHETTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d541c6ddf0221a38b5bf17bde071c16e4fc5d59c6c056a12206b90f86b0b039, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B2EDCC53DBB4AA0ABD5E56CEB34FAF620B051435FE8057488BAB1D4B20721FD1, cn=MAHESH GURULING HANSHETTI
Date: 2024.07.19 11:33:53 +05'30'

**(महेश हंशेट्टी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.

२) आयुक्त आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

७) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे.

८) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

९) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-१३) मंत्रालय, मुंबई.

१०) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, (का-१४७२) मंत्रालय, मुंबई.

१०) अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती (आरोग्य-५)